विषयः-मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम ४१
खालील अधिसूचनेमुळे ४ टक्के विक्रीकराचा दर
लागू असलेल्या मालाच्या आंतरराज्यीय विक्रीसाठी
१ एप्रिल १९९९ ते ३१ मार्च २००३ या
कालावधीसाठी "ग" नमुने (सी फॉर्म) सादर
न केल्यामुळे येणा-या अधिकच्या करदायित्वाची
माफी द्यावयाबाबतची प्रशासकीय सवलत.

---

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-विकअ-२००२/प्रक्र.२४ क/कराधान-२**
**मंत्रालय,मुंबई-४०००३२,**
**दिनांकः-** 14 NOV 2002

**वाचाः** अधिसूचना क्र.सीएसटी-१०९५/सीआर-६२सी/कराधान-२, दिनांक २.२.१९९६

**प्रस्तावनाः**

महाराष्ट्र शासनाने उपरोक्त अधिसूचनेअन्वये ज्या मालाच्या विक्रीवर मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम ४१ खालील कोणत्याही अधिसूचनेमुळे ४ टक्के किंवा त्यापेक्षा कमी दराने कर लागू असेल तर अशा मालाच्या आंतरराज्यीय विक्रीवर सवलतीच्या दराचा फायदा घेण्यासाठी "ग" नमुना ("सी" फॉर्म) सादर करण्याची आवश्यकता नाही, अशी तरतूद केलेली होती. दिनांक १ एप्रिल १९९९ पासून मुंबई विक्रीकर अधिनियमाखाली उलाढाल कर व अधिभार या कराची तरतूद प्रविष्ट केल्यामुळे अशा कराचा दर ४ टक्क्याहून अधिक दराने लागू होतो. त्यामुळे अशा प्रकरणात व्यापा-यांना उपरोक्त अधिसूचनेचा फायदा घेता येत नाही. परंतु ब-याच व्यापा-यांनी अशा आंतरराज्यीय विक्री व्यवहाराबाबत "ग" नमुने गोळा केलेले नाहीत. त्यामुळे अशा व्यापा-यांना "ग" नमुन्याअभावी १० टक्के किंवा मुंबई विक्रीकर अधिनियमाच्या परिशिष्टाप्रमाणे लागू असलेला, जो अधिक असेल, त्या दराने करदायित्व येते. मागील कालावधीसाठी "ग" नमुने आता गोळा करणे व्यापा-यांना अडचणीचे होत आहे. व्यापा-यांची सदर अडचण लक्षात घेऊन शासन खालीलप्रमाणे प्रशासकीय सवलत मंजूर करीत आहे :-

**शासन निर्णयः**

१ एप्रिल १९९९ ते ३१ मार्च २००२ या कालावधीसाठी ज्या मालाच्या विक्रीवर मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या कलम ४१ खालील कोणत्याही अधिसूचनेमुळे विक्रीकराचा दर ४ टक्के किंवा त्याहून कमी दराने लागू असेल आणि अशा विक्रीवर उलाढाल कर व अधिभार लागू केल्यामुळे एकूण कराचा दर ४ टक्के हून अधिक होत असेल तर अशा मालाच्या आंतरराज्यीय विक्रीवर येणा-या एकूण करदायित्वापैकी (व्याज व शास्तीसहित), व्यापा-याने जर "ग" नमुने सादर केले असते तर जे करदायित्व (व्याज व शास्तीसहित) आले असते, त्या करदायित्वाहून अधिक करदायित्वाची (व्याज व शास्तीसहित) खालीलप्रमाणे प्रशासकीय सवलत देण्यात येत आहे :-

१) उक्त प्रकरणी व्यापा-याने "ग" नमुने सादर केले नाही तर त्याच्या आंतरराज्यीय विक्रीवर केंद्रीय विक्रीकर अधिनियम, १९५६ च्या कलम ८ च्या उपकलम २(ब) प्रमाणे करदायित्व येईल. अशाप्रकारे निर्धारणा पूर्ण झाल्यानंतर पुढील कार्यवाही करण्यात यावी.

२) अशाप्रकरणी व्यापा-याने "ग" नमुने सादर केले असते तर त्याला जे करदायित्व (व्याज व शास्तीसहित ) आले असते, त्याची गणना करण्यात यावी व सदर करदायित्वाची रक्कम पूर्वोक्त निर्धारित करदायित्वामधून वजा करण्यात यावी. उर्वरित रक्कम प्रशासकीय सवलतीद्वारा माफ करण्यात यावी.

३) सदर प्रशासकीय सवलतीचा लाभ घेणा-या व्यापा-याने दि.१ एप्रिल १९९९ ते ३१ मार्च २००२ या कालावधीसाठी ४ टक्के हून अधिक कर वसूल केलेला असेल अथवा कराचा भरणा केलेला असेल तर अशा ४ टक्के हून अधिक रायी प्रशासकीय सवलत मिळणार नाही.

४) प्रशासकीय सवलत मंजूर केल्यामुळे कोणत्याही प्रकरणात परतावा द्यावा लागणार नाही.

५) उपरोक्त प्रशासकीय सवलत देण्याचे अधिकार विक्रीकर आयुक्तांना देण्यात आलेले आहेत.

६) आवश्यकतेनुसार सदर अधिकार आयुक्तांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अपर विक्रीकर आयुक्त, विक्रीकर उपआयुक्त (प्रशासन), सहायक विक्रीकर आयुक्त (प्रशासन) यांना प्रदान करण्याची परवानगी विक्रीकर आयुक्तांना देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(एस.एन.जाननेदे )
शासनाचे उप सचिव.

प्रत,

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव,मुंबई-४०००१०.
२. महालेखापाल (एसटीआरअे), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. महालेखापाल (एसटीआरअे), महाराष्ट्र-२, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
६. निवड नस्ती, कराधान-२.